जिल्हा परिषदेतील रुपांतरीत नियमित
अस्थायी आस्थापनेवरील कर्मचा-यांना
कामानुसार हुद्दा व हुद्दयानुसार
वेतनश्रेणी देण्याबाबत.
जिल्हा परिषद अकोला.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वेतन-८११६/प्र.क्र.२०८/आस्था-१०**
बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ
**फोर्ट,मुंबई-४०० ०३२,**
तारीखः **२० जानेवारी २०१७**

वाचा :-

1) **शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक-संकिर्ण-११९९/९०भाग-४/सेवा-५,दिनांक २९ सप्टेंबर, २००३**
2) **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांचे पत्र क्र.जि.प.लसिंवि/आस्था-१/१३९६/२०१२,दि.९/१०/२०१३**

## शासन निर्णय

पाटबंधारे विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांच्या कामाच्या प्रमाणात वाढ होऊनही वाढीव कामाच्या तुलनेत कर्मचा-यांच्या संख्येत वाढ झाली नाही. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक बीजीटी-२५८६/सीआर-७/आरईएस-५, दिनांक २८/५/१९८६ नुसार नवीन पदे निर्माण करण्यास व रिक्त पदे भरण्यास बंदी घालण्यात आली होती. तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १०८८/१५(२)/सेवा-१०, दिनांक ६/२/१९८९ अन्वये रोजंदारी व कार्यव्ययी आस्थापनेवरील पदे निर्माण करण्यास बंदी घालण्यात आली होती. त्यामुळे मजूर किंवा तत्सम पदावर नेमणूक करण्यात आलेल्या कर्मचा-याकडून आवश्यकतेनुसार समकक्ष वा वरिष्ठ पदाची कामे करुन घेतली गेली. मात्र कर्मचा-यांना नेमणूक दिलेल्या पदाऐवजी इतर वरिष्ठ पदाचे काम करुन घेऊन सुध्दा मूळ नेमणूक दिलेल्या निम्नदर्जाच्या पदाचे वेतन देण्यात आले आणि या परिस्थितीमुळे कामानुसार हुद्दा व हुद्यानुसार वेतन हा प्रश्न निर्माण झाला.

२. कामानुसार हुद्दा व हुद्दयानुसार वेतन देण्याबाबतच्या मागणीचा शासनाकडे सातत्याने पाठपुरावा करण्यांत आला. त्यामुळे तत्कालीन मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम यांच्या अध्यक्षतेखाली सार्वजनिक बांधकाम विभागाने समिती गठीत केली होती. सदर समितीच्या शिफारशी व वेळोवेळी

कामगार प्रतिनिधींच्या प्राप्त झालेल्या विनंतीचा साधकबाधक विचार करुन शासनाने मंत्रीमंडळाच्या मान्यतेने शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक संकीर्ण-१९९९/९० भाग-४/सेवा-५,दिनांक २९ सष्टेंबर, २००३ अन्वये पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.सदरचा शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या अंतर्गत जिल्हा परिषदेतील कर्मचा-यांना पुढील अटींच्या अधीन राहून लागू करण्यात येत आहे.

**१) जिल्हा परिषदेच्या आस्थापनेवरील रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर कार्यरत असलेल्या ज्या कर्मचा-याकडून त्यांना नेमणूक दिलेल्या मुळ पदाऐवजी इतर पदाचे काम करुन घेण्यात आलेले आहे आणि तसे काम करुन घेतांना त्यांना नेमणूक दिलेल्या मुळ पदाचेच वेतन देण्यात आलेले आहे अशा कर्मचा-यांची नावानिशी माहिती मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांनी त्यांच्या उपरोक्त क्र.२ येथील पत्रान्वये शासनाकडे पाठविलेली आहे. अशा कर्मचा-यांना पुढील अटींच्या अधीन राहून "कामानुसार हुद्दा व हुद्यानुसार वेतन" देण्यास मान्यता देण्यात येत आहे.**

(अ) जिल्हा परिषदेच्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या ज्या कर्मचा-यांकडून दि.२८/५/१९८६ नंतर म्हणजेच नवीन पदे निर्माण करण्यास व रिक्त पदे भरण्यास बंदी घातल्याच्या दिनांकापासून व दि.३१/१२/१९९७ पूर्वी, त्यांना नेमणूक दिलेल्या मूळ पदाऐवजी इतर पदाचे काम करून घेण्यांत आले आहे आणि त्यांचे जे पद रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्यात आलेले आहे, अशा सोबत जोडलेल्या परिशिष्टातील कर्मचा-यांना कामानुसार हुद्दा व हुद्दयानुसार वेतन देण्यात यावे.

(ब) संबंधित कर्मचा-यांनी वरिष्ठ पदाचे वेतन न घेता मूळ नेमणूकीच्या पदाव्यतिरिक्त अन्य वरिष्ठ वा तत्सम पदावर कामे केले असले पाहिजे.

(क) ज्या वरिष्ठ पदावर कर्मचारी काम करीत आहेत. त्या पदासाठी आवश्यक असलेली किमान शैक्षणिक अर्हता त्यांनी संपादन केली नसेल तर अशा कर्मचा-यांना (उदा.लिपिक-टंकलेखक इ.) कामानुसार हुद्दा व हुद्यानुसार वेतन देण्याचा विचार केला जाऊ नये. मात्र सुतार , गवंडी, पंपचालक, तारतंत्री, रंगारी, जोडारी, नळ कारागिर, यांत्रिकी,उद्वाहन चालक, इंजिन चालक, माळी तसेच विद्युत विभागातील ज्या पदाकरीता तांत्रिक ज्ञान व कौशल्य आवश्यक असते अशा कर्मचा-यांनी ते कौशल्य संपादित केले असेल आणि त्यांना अशा कामाचा किमान तीन वर्षाचा अनुभव असेल तसेच त्यांचा सेवा अभिलेख समाधानकारक असेल तर त्या पदाकरीता आवश्यक असलेली शैक्षणिक अर्हता शिथिल करण्यात यावी.

(ड) दिनांक १ जानेवारी, १९९८ नंतर मूळ नियुक्तीपेक्षा इतर पदावर काम करीत असलेल्या कर्मचाऱ्यांचा यासाठी विचार केला जाऊ नये.

(इ) संबंधित कर्मचाऱ्यांना ज्या पदावर घ्यावयाचे आहे त्या पदावर मानके/मापदंडाप्रमाणे आवश्यकता असेल तर जिल्हा परिषदांनी सदर पदाचे पूर्णवेळ काम आहे किंवा नाही याची

शहानिशा करून प्रमाणपत्र देणे आवश्यक आहे. मानके/मापदंडानुसार कर्मचारी अतिरिक्त ठरत असल्यास ते अन्य ठिकाणी नेमणूकीस पात्र राहील व त्यांनी कुठल्याही कारणास्तव बदली नाकारली तर त्यांना दिलेला हुद्दा काढून घेण्यात येईल.

(फ) संबंधित कर्मचा-यांची सेवाजेष्ठता सूची विभागीय (डिव्हीजनल) स्तरावर ठेवली जात असल्यामुळे कामगार कपातीचा प्रश्न आल्यास कनिष्ठतम व्यक्तीपासून कर्मचारी कपात करण्यात यावी.

**२) कामानुसार हुद्दा व हुद्दयानुसार वेतन देण्याचे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या वर क्रमांक-१ येथे नमूद केलेल्या दि.२९ सष्टेंबर,२००३ च्या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू करण्यात यावेत, आणि संबंधित कर्मचा-यांची दि.२९ सष्टेंबर, २००३ च्या शासन निर्णयाच्या दिनांकापासून वेतननिश्चिती करण्यात यावी. असे करतांना असा कर्मचारी शासन निर्णयाच्या दिनांकाला पाचव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणीनुसार त्याच्या मुळ नियुक्तीच्या पदावर जे वेतन घेत असेल तो टप्पा किंवा नंतरच्या नजिकचा टप्पा त्याला ज्या वरिष्ठ नवीन पदाची वेतनश्रेणी द्यावयाची आहे त्या वेतनश्रेणीत असेल तर त्या टप्प्यावर त्याचे वेतन निश्चित करावे.**

**३) कामानुसार हुद्दा व हुद्दयानुसार वेतनश्रेणी द्यावयाचे कर्मचारी दिनांक २९ सष्टेंबर, २००३ या दिनांकाला कालबध्द पदोन्नतीचा फायदा घेत असतील तर अशा कर्मचा-यांच्या बाबतीत वर परिच्छेद-२ मध्ये निर्धारित केल्याप्रमाणे वेतन निश्चिती आणि कालबध्द पदोन्नतीमुळे निश्चित केलेले वेतन यापैकी जे वेतन कमाल असेल ते वेतन त्यांना अदा करण्यांत यावे.**

**४) संबंधित कर्मचा-यांचे रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेतलेले मूळ पद व त्या पदाच्या वेतनश्रेणीमध्ये तद्नुषंगिक बदल करण्यांत यावे. वरिष्ठ वा तत्सम पदाचा हुद्दा व वेतनश्रेणी मिळाल्यानंतर ही पदे नियमित संवर्गात न येता रुपांतरित अस्थायी आस्थापनेवरच राहतील. आणि संबंधितांचे मुळ पद आपोआप नष्ट होईल. संबंधित कर्मचारी सेवानिवृत्त केल्यास, राजीनामा दिल्यास किंवा विभागीय चौकशीअंती सेवेतून काढून टाकणे/बडतर्फेची शिक्षा दिल्यास त्याचे रुपांतरित अस्थायी आस्थापनेवरील वरिष्ठ वा तत्सम पदही आपोआप नष्ट होईल.**

**५) यावर होणारा खर्च संबंधित कर्मचा-यांच्या वेतनावरील खर्च ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकला जातो त्या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.**

**६) कामानुसार हुद्दा व हुद्दयानुसार वेतनश्रेणी विभाग देण्याबाबतचा प्रस्ताव मान्य करण्याचे अधिकार सार्वजनिक बांधकाम विभागाने विभाग प्रमुखांना दिलेले आहेत. विभाग प्रमुख म्हणजे महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्थी) नियम १९८१ मधील परिशिष्ट-२ सूचीबध्द केलेला अधिकारी**

३. हे आदेश शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक संकीर्ण १९९९/९०-भाग-४/सेवा-५, दिनांक २९ सष्टेंबर, २००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२११५२०५२५४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bharat A Patil

Digitally signed by Bharat A Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c76c164f6ef274ed4e9237b7a5059a808d0bc9533462a615c99dc441b7638c25, cn=Bharat A Patil
Date: 2017.02.17 16:34:41 +05'30'

**भरत पाटील**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति

मुख्य कार्यकारी अधिकारी
जिल्हा परीषद,
अकोला.

प्रत

१) विभागीय आयुक्त, अमरावती.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
३) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई
४) निवडनस्ती, का.क्र.आस्था-१०,ग्रामविकास व जलसंधारण विभाग मंत्रालय, मुंबई

**परिशिष्ट - अ**

**शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्रमांक-वेतन-८११६/प्र.क्र.२०८/आस्था-१०,**

**दिनांक:- २० जानेवारी,२०१७**

**(जिल्हा परिषद अकोला)**

| क्र. | कर्मचा-याचे नाव | नियुक्तीच्या मुळ पदाचे नाव | कामानुसार हुद्दा व हुद्यानुसार वेतनश्रेणी द्यावयाच्या पदाचे नाव |
|---|---|---|---|
| १. | श्री.धनंजय वसंतराव आसोलकर | चौकीदार | कनिष्ठ सहाय्यक |
| २. | श्री.मनिष जानराव पाटील | चौकीदार | मिस्त्री श्रेणी-२ |
| ३. | श्री.गजानन ज्ञानदेव बिचारे | चौकीदार | मिस्त्री श्रेणी-२ |